कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाचे नाव कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय करण्याबाबत व त्यानुषंगाने संबंधित कार्यालयांच्या व पदांच्या पदनामात बदल करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कौशल्य विकास व उद्योजकता विभाग
शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०१९/प्र.क्र.५१/प्रशा-२
४ था मजला (विस्तार), हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २४ डिसेंबर, २०१९

वाचा :- १) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्रमांक इएसई-२००१/प्र.क्र.११/रोस्वरो-३, दिनांक २२.०१.२००१
२) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्रमांक इएसई-२०११/प्र.क्र.२०/प्रशा-२, दिनांक ११.०२.२०११
३) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्रमांक इएसई-२०११/प्र.क्र.२०/प्रशा-२, दिनांक ०५.०३.२०११
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एईओ-१०१५/प्र.क्र.०६/२०१५/दहा, दिनांक १५.०१.२०१५
५) शासन निर्णय, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, क्रमांक कौविअ-२०१५/प्र.क्र.८८/प्रशा-२, दिनांक ०१.०७.२०१५

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.एईओ ११००/१०/२०००/दहा, दिनांक २९.१२.२००० च्या अ.शा.पत्रान्वये, आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार हे पद पूर्वीच्या संचालक, रोजगार व स्वयंरोजगार या पदाच्या अधिकातील वेतनश्रेणीत उन्नत करुन भरण्यात आले आहे. त्यानुसार वरील वाचा क्र.१ येथील शासन निर्णय, दिनांक २२.०१.२००१ अन्वये आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार यांना रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयाचे विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्यात आले आहे. तेव्हापासून आजतागायत संचालनालयावर विभाग प्रमुख म्हणून आयुक्त या वरिष्ठ व भारतीय प्रशासन सेवा अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यात येत आहे.

वरील वाचा क्र.४ येथील सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १५.०१.२०१५ अन्वये रोजगार व स्वयंरोजगार विभागाचे कौशल्य विकास व उद्योजकता विभाग असे नामकरण करण्यात आले आहे. त्यानुषंगाने रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयाचे, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय व त्या अधिनस्त कार्यालयांचे व विविध संवर्गाच्या पदनामाचे देखिल नामकरण, वरील वाचा क्र.४ येथील शासन निर्णय, दिनांक ०१.०७.२०१५ अन्वये करण्यात आले आहे.

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाचे विभाग प्रमुख आयुक्त असल्याने प्रशासनिक सुलभतेसाठी संचालनालयाचे “आयुक्तालय” असे नामामिधान करणे तसेच संचालनायाच्या अधिनस्त कार्यालयांचे व पदसंरचनेतील पदांचे नामाभिधान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाचे विभाग प्रमुख आयुक्त असल्याने प्रशासनिक सुलभतेसाठी कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाचे नाव कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय असे करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच, या अधिनस्त विभागीय मुख्यालयाचे व पदांचे नामाभिधान पुढीलप्रमाणे करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात आहे-

अ) कार्यालयाचे नाव :-

| अ.क्र. | सध्याचे नाव | नवीन नाव |
|---|---|---|
| १ | कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागीय मुख्यालय | कौशल्य कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागीय आयुक्तालय |

ब) पदाचे नाव:-

| अ.क्र. | सध्याचे पदनाम | नवीन पदनाम |
|---|---|---|
| १ | उपसंचालक | उप आयुक्त |
| २ | सहायक संचालक | सहायक आयुक्त |

उपरोक्त बदल हे खालील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहेत-

१. पदांच्या नावांमध्ये झालेल्या बदलामुळे उक्त पदांचे सेवाप्रवेश नियमातही बदल करण्यात येतील.
२. पदांच्या नामाभिधानामुळे कोणत्याही संवर्गाचा भविष्यात वेतनस्तर वाढविण्याबाबतची मागणी करण्यात येणार नाही.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९९८/का.१२, दिनांक ०२.११.२०१९ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४४८/२०१९/सेवा-९, दिनांक ०९.१२.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२२४१६०९२५५००३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sakharam Dina Kharat

Digitally signed by Sakharam Dina Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=34e795101cfc08377272f409bc9348c5d84ec89bc33bd49bcb71e896a5e56b29, serialNumber=eb1cb39de10fe09852a24a5fa63add6d5b204146d3716e740e20fb4b2a378a55, cn=Sakharam Dina Kharat
Date: 2019.12.24 16:15:21 +05'30'

( स. दि. खरात )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव

४) मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
५) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
७) सर्व प्रशासकीय विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
८) सर्व विभागीय आयुक्त
९) सर्व जिल्हाधिकारी
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर
११) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३) उपकोषागार कार्यालय, नवी मुंबई
१४) निवासी लेखा परीक्षक, मुंबई
१५) सर्व कार्यासने, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) सा.प्र.वि/१२ व वित्त विभाग, सेवा-९
१७) निवडनस्ती (प्रशा-२).